शासकीय कार्यालये/संस्था/महामंडळे/ सार्वजनिक उपक्रम यांच्या बँक खात्यातील अखर्चित रकमा शासन खाती जमा न केल्यास माहे मे, २०२० पासूनची वेतन/ वेतन अनुदान देयके रोखून ठेवण्याबाबत...

महाराष्ट्र शासन
वित्त विभाग
शासन परिपत्रक क्रमांकः संकीर्ण- २०२०/प्र.क्र.६७/कोषा-प्रशा-५
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- २६ मे, २०२०

वाचा:- वित्त विभाग, शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दि.४ मे, २०२०

**शासन परिपत्रक :-**

कोव्हीड-१९ या संसर्गजन्य रोगाच्या प्रादुर्भावामुळे जाहीर करण्यात आलेल्या लॉकडाऊनमुळे राज्यातील कर व करेतर महसुलात घट होऊन त्याचा राज्याच्या अर्थव्यवस्थेवर विपरीत परिणाम झाला आहे. संदर्भाधिन शासन निर्णयान्वये उपरोक्त पार्श्वभूमीवर अर्थव्यवस्थेवरील परिणामाबाबत काही वित्तीय उपाययोजना केल्या आहेत.

२. सदर शासन निर्णयातील परिच्छेद क्र.१७ अन्वये सर्व शासकीय कार्यालये/ संस्था/ महामंडळे/ सार्वजनिक उपक्रम यांना त्यांचेकडील बँक खात्यात असलेली शिल्लक रक्कम तसेच स्वीय प्रपंजी लेखा खात्यातील अखर्चित निधी दि.३१.०५.२०२० पूर्वीच शासनास समर्पित करण्याचे आदेश देण्यात आले आहेत. त्याखेरीज पुढील कोणतीही देयके पारीत केले जाणार नाहीत, असेही नमूद करण्यात आले आहे.

३. अद्यापि अनेक कार्यालयांनी त्यांच्याकडील बँक खात्यातील अखर्चित निधी शासकीय लेख्यात जमा करणेबाबत आवश्यक कार्यवाही केली नसल्याचे निदर्शनास आले आहे. तरी याद्वारे सर्व कोषागारांना सूचित करण्यात येते की, माहे मे, २०२० च्या माहे जून, २०२० मध्ये प्रदान करण्यात येणा-या वेतन (०१) आणि सहायक अनुदान, वेतन (३६) देयके पारीत करण्यापूर्वी देयकांसोबत संबंधितांनी त्यांच्या आस्थापनेवरील बँक खात्यावरील दि.३१ डिसेंबर, २०१९ पर्यंत जमा रकमेपैकी अखर्चित निधी (केंद्रशासनाचा निधी वगळून) शासन जमा केला असल्याबाबतचे हमीपत्र देयकासोबत असल्याची खात्री करावी. त्याखेरीज वेतन/सहायक अनुदान, वेतन देयके पारीत करू नयेत. तसेच त्यापुढील कोणतीही देयके पारित करण्यात येऊ नयेत. हमीपत्राचा नमूना सोबत जोडला आहे.

४. स्वीय प्रपंजी लेखा खात्यातील शिल्लक रक्कमा शासन खाती जमा करण्याबाबत वेगळा आढावा घेऊन निधी जमा करण्याच्या सूचना स्वतंत्रपणे देण्यात येतील.

५. याशिवाय सर्व प्रशासकीय विभागांनी त्यांच्या अधिनस्त असलेल्या स्वायत्त संस्था, ज्यांना शासनाकडून कोणतेही वेतन अथवा वेतनेतर अनुदान दिले जात नाही, अथवा अंशत: अनुदान दिले जाते (विद्यापिठे वगळून) अशा संस्थांकडे, त्यांचा स्वत:चा किती निधी शिल्लक आहे, याची संस्थानिहाय आकडेवारी वित्त विभागाच्या “साधनसंपत्ती” कार्यासनाकडे दि.३१.०५.२०२० पर्यंत सादर करावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२००५२६१४४६२००००५ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

INDRAJEET SAMBHAJI GORE

Digitally signed by INDRAJEET SAMBHAJI GORE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=6015944fe7d58a83f4a54c43147b5da1e34861e2984e9f793b66f7249aaa9c1a, postalCode=400032, street=Y-5/66,GOVERNMENT COLONY,MUMBAI, serialNumber=d4994742192306fcc1dea9aadd3810639506519fa652b919767b98b04e905a18, ou=FINANCE DEPUTY SECRETARY, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=INDRAJEET SAMBHAJI GORE
Date: 2020.05.26 15:04:30 +05'30'

**( इंद्रजित गोरे )**
**शासनाचे उप सचिव**

**प्रत :-**

१. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
२. सर्व सन्माननीय विधानसभा / विधान परिषद व संसद सदस्य.
३. राज्यपालांचे सचिव
४. मुख्यमंत्र्यांचे सचिव
५. उपमुख्यमंत्र्यांचे सचिव
६. सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
७. सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग
८. मंत्रालयीन सर्व विभागांच्या अधिनस्त असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख
९. प्रबंधक, मूळ न्यायालय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई
१०. प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.
११. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, नागपूर
१२. महालेखापाल (लेखापरिक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर
१३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र नागपूर
१४.आयुक्त, आयकर (TDS) चर्नीरोड, मुंबई ४००००२
१५.आयुक्त, आयकर (TDS) सिव्हील लाईन, नागपूर ४४४००१
१६. प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा) मुंबई
१७.सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग,मुंबई
१८. सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई

१९. प्रबंधक, लोक आयुक्त व उपलोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
२०. प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई
२१. मुख्य माहिती आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२२. विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदर, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली
२३. सर्व विभागीय आयुक्त
२४. सर्व जिल्हाधिकारी
२५. सर्व जिल्हापरिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
२६. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
२७.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२८. सहसंचालक, लेखा व कोषागारे, कोकण/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती
२९. संचालक, स्थानिक निधी लेखा परिक्षा, कोकण भवन, नवी मुंबई
३०. सह संचालक, स्थानिक निधी लेखा परिक्षा मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती
३१. वित्त विभागातील सर्व कार्यासने
३२. निवड नस्ती कोषा प्रशा-५.

## हमीपत्र

**अ) वेतन (०१) आहरणाबाबत**

मी ........................................... आहरण व संवितरण अधिकारी, कार्यालय ................................................ अशी हमी देतो/देते की, वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसंकल्प-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दि.४ मे, २०२० अन्वये दिलेल्या निर्देशानुसार या कार्यालयाकडील बँक खात्यातील दि. ३१ डिसेंबर, २०१९ पर्यंत प्राप्त रकमांपैकी शिल्लक / अखर्चित निधी (केंद्रशासनाचा निधी वगळून) एकूण रक्कम रुपये ................ शासन खाती जमा करण्यात आले आहेत, याची मी खात्री केली आहे. त्याची यादी सोबत जोडली आहे. (कार्यालयाचे नाव, चलन क्रमांक व दिनांक, रक्कम इत्यादी तपशीलासह )

सदर खाती सद्य:स्थितीत दि.३१ डिसेंबर, २०१९ पूर्वी आहरित रकमांपैकी वरील रक्कम जमा केल्यानंतर ज्या रकमा शिल्लक आहेत, त्या दि.३१ मे, २०२० पर्यंत खर्च होणार आहेत. तसे न झाल्यास त्यासाठी मी व्यक्तिश: जबाबदार राहील.

दिनांकः- आहरण व संवितरण अधिकारी
ठिकाणः- (नांव व पदनाम )

**ब) सहायक अनुदान, वेतन (३६) आहरणाबाबत**

मी.................................... आहरण व संवितरण अधिकारी, कार्यालय ............................ अशी हमी देतो/देते की, वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसंकल्प-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दि.४ मे, २०२० अन्वये दिलेल्या निर्देशानुसार या कार्यालयाच्या अधिनस्त सर्व कार्यालये/ संस्था/ महामंडळे/सार्वजनिक उपक्रम इत्यादी यांचेकडील बँक खात्यातील दि.३१ डिसेंबर, २०१९ पर्यंत प्राप्त रकमांपैकी शिल्लक / अखर्चित निधी (केंद्रशासनाचा निधी वगळून) एकूण रक्कम रुपये ................ शासन खाती जमा करण्यात आले आहेत, याची मी खात्री केली आहे. त्याची यादी सोबत जोडली आहे. (कार्यालयाचे नाव, चलन क्रमांक व दिनांक, रक्कम इत्यादी तपशीलासह )

सदर खाती सद्य:स्थितीत दि.३१ डिसेंबर, २०१९ पूर्वी आहरित रकमांपैकी वरील रक्कम जमा केल्यानंतर ज्या रकमा शिल्लक आहेत, त्या दि.३१ मे, २०२० पर्यंत खर्च होणार आहेत. तसे न झाल्यास त्यासाठी मी व्यक्तिश: जबाबदार राहील.

दिनांकः- आहरण व संवितरण अधिकारी
ठिकाणः- (नांव व पदनाम )